डेझिंग प्रक्रिया करणाऱ्या *Envitech Marine Consultants Private Limited* या कंपनीस रु.६७,११,४६६/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-०७२१/प्र.क्र.१३७/विशा-१अ**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.संकीर्ण-०७२१/प्र.क्र.१३७/विशा-१ अ, दिनांक ३०.०८.२०२१.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं /२०/ १९५/ पानसरे हत्या/३७५/२०१७, दिनांक १२.०१.२०२२.

**प्रस्तावना :-**

कॉ.गोविंद पानसरे हत्येचा तपास मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.१५६५/२०१५ अन्वये मा.उच्च न्यायालयाच्या निगराणीखाली करण्यात येत आहे. कॉ.पानसरे, डॉ.दाभोळकर, प्रा. कलबुर्गी व जेष्ठ पत्रकार गौरी लंकेश हत्येच्या गुन्ह्यात वापरण्यात आलेल्या तीन पिस्टल (अग्निशस्त्र) चे बॅरल व फायरिंग पिन काढून पुरावा नष्ट करण्याच्या उद्देशाने ते नदी पात्रातील पाण्यात (खाडीमध्ये) ठाणे-नाशिक हायवे ब्रिजखाली खारेगाव खाडी येथे टाकले असल्याचे आरोपीनीं कबूल केले आहे.

२. क्रिमिनल रिट याचिका क्र.१५६५/२०१५ च्या सुनावणीच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयाने दि.२६.०४.२०१९ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१०.०५.२०१९ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये *Envitech Middle East Co.* या कंपनीला अत्याधुनिक यंत्रणेचा वापर करुन पिस्टल पार्टचा खाडीमध्ये शोध घेण्याचे काम देण्याचे निश्चित करण्यात आले व त्यासाठी येणारा खर्च महाराष्ट्र शासन, कर्नाटक शासन व केंद्रशासनाने १/३ प्रमाणे प्रत्येकी करण्याचे निश्चित करण्यात आले आहे. तसेच दि. २९.०५.२०१९ रोजीच्या बैठकीमध्ये सी.बी.आय.साठी केंद्र सरकारच्या हिस्स्याची १/३ रक्कम तुर्तास महाराष्ट्र शासनाने अदा करण्याचे व नंतर DoPT केंद्र सरकारच्या मंजूरीने सदर रक्कम परत प्राप्त करुन घेण्याचे निश्चित करण्यात आले आहे. त्यामुळे सद्य:स्थितीत महाराष्ट्र शासनाने एस.आय.टी. च्या १/३ व सी.बी.आय. चे १/३ अशी २/३ खर्चाची रक्कम अदा करावयाची आहे.

३. आता, *Envitech Middle East Co.* या नावाची कंपनी बंद झालेली असल्याने व सध्या भारतात *Envitech Marine Consultants Private Limited* या कंपनीची नोंद केलेली असल्याने *Envitech Middle East Co*. या नावे असलेले आर्थिक व्यवहार *Envitech Marine Consultants Private Limited* या नावाने होत असल्याचे तपास अधिकारी तथा अपर पोलीस अधीक्षक, कोल्हापूर यांनी कळविले आहे.

४. एस.आय.टी. चा खर्चाचा वाटा १/३ प्रमाणे रक्कम रु.३३,५५,७३३/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष पंचावन्न हजार सातशे तेहतीस फक्त) सी.बी.आय. (केंद्र सरकारच्या १/३ रक्कमेचा हिस्सा) च्या खर्चाचा वाटा १/३ प्रमाणे रु.३३,५५,७३३/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष पंचावन्न हजार सातशे तेहतीस फक्त) अशी २/३ प्रमाणे एकुण रु.६७,११,४६६/- (अक्षरी रुपये सदुसष्ठ लक्ष अकरा हजार चारशे सहासष्ठ फक्त) इतकी ४०% आगावू रक्कम *Envitech Marine Consultants Private Limited* या कंपनीला देण्याबाबतच्या प्रस्तावास मंजूरी देण्याची व सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

एस.आय.टी. चा खर्चाचा वाटा १/३ प्रमाणे रक्कम रु.३३,५५,७३३/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष पंचावन्न हजार सातशे तेहतीस फक्त) सी.बी.आय. (केंद्र सरकारच्या १/३ रक्कमेचा हिस्सा) च्या खर्चाचा वाटा १/३ प्रमाणे रु.३३,५५,७३३/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष पंचावन्न हजार सातशे तेहतीस फक्त) अशी २/३ प्रमाणे एकुण रु.६७,११,४६६/- (अक्षरी रुपये सदुसष्ठ लक्ष अकरा हजार चारशे सहासष्ठ फक्त) इतकी ४०% आगावू रक्कम *Envitech Marine Consultants Private Limited* या कंपनीला देण्यास व सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च हा गृह विभाग मागणी क्र. बी-१, २०५५-पोलीस, १०९-जिल्हा पोलीस बल, (२०५५ ०१६८) २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या वित्तिय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमावली, १९७८, भाग-१, उपविभाग-२ मधील अ.क्र.१३, नियम क्र.६० व ६१ अन्वये विभागप्रमुख व प्रादेशिक प्रमुख यांना असलेले खर्चाचे अधिकार व वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अ.क्र. ६, नियम-४०(१) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात तसेच वित्त

विभागाच्या क्र.अनौसं-५५०/२०२१/व्यय-७, दि.१८.०८.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. शासन निर्णय, गृह विभाग क्र.संकीर्ण-०७२१/प्र.क्र.१३७/विशा-१ अ, दिनांक ३०.०८.२०२१ या आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२०४१५०६३६९१२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.02.04 15:08:30 +05'30'

**( संजय खेडेकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, गु.अ.वि., महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४) पोलीस अधीक्षक, कोल्हापूर.
५) तपास अधिकारी तथा अपर पोलीस अधीक्षक, कोल्हापूर.
६) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
८) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.